शासन मान्यता प्राप्त महासंघ / संघटना यांच्या निवेदनांना / पत्रांना उत्तरे देण्यासाठी कालमर्यादा विहित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक : आरजीए-१००१/९३३/प्र.क्र.१/२००१/१६-अ,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :-४.२.२००२

वाचा :- १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आरजीए-१०९१/सीआर-४०/१६-अ, दि.१० ऑक्टोबर, १९९१.

२) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र.आरजीए-१०९६/२/प्र.क्र.६/९६/१६-अ, दिनांक ५ सप्टेंबर,९७.

३) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र. आरजीए-१००१/९३३/प्र.क्र.१/२००१/१६-अ, दि.११ जून,२००१.

**पार्श्वभूमी :-**

शासन मान्यता प्राप्त संघटना / महासंघ / सर्वसंघ यांनी मागणी केल्यास गोपनीय नसलेले शासन निर्णय / परिपत्रके / आदेश, इत्यादीच्या प्रती त्यांना उपलब्ध करुन द्याव्यात. तसेच प्रशासकीय विभागांनी / कार्यालयांनी अधिकारी / कर्मचा-यांच्या सेवा विषयक प्रश्नांबाबत शासन मान्यता प्राप्त संघटना / महासंघ / सर्वसंघ यांच्याकडून आलेली अभिवेदने, विज्ञापने अथवा शिष्टमंडळे यांनी दिलेली निवेदने इत्यादींपैकी ज्या पत्रांना / अभिवेदनांना उत्तरे दिल्यामुळे गोपनीयतेचा भंग होत नसेल, अशा पत्रांना / अभिवेदनांना कटाक्षाने व त्वरीत उत्तरे दयावीत, अशा सूचना या विभागाच्या वर वाचा मधील क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

२. महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघासोबत मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.२२.११.२००१ रोजी झालेल्या संयुक्त विचार विनिमय समितीच्या बैठकीत महासंघाच्या वतीने असा आग्रह धरण्यात आला की, महासंघाच्या पत्रव्यवहाराला उत्तरे देण्यासाठी कालावधी ठरवून द्यावा. ही मागणी विचारात घेता मुख्य सचिव यांनी असे निदेश दिले आहेत की, शासन मान्यता प्राप्त संघटना / महासंघ / सर्वसंघ यांच्याकडून प्राप्त झालेल्या पत्रांना / अभिवेदनांना ती विभागात / कार्यालयात प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत अंतरिम उत्तरे देण्यात यावीत व ३ महिन्याच्या आत अंतिम उत्तरे देण्यात यावीत.

३. हे आदेश अंमलात आणण्यासाठी दि.११ जून,२००१ च्या परिपत्रकात सुधारणा करण्यात येत आहे.

(कृ.मा.प.)

**शासन शुद्धीपत्रक :-**

शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक आरजीअे-१००१/प्र.क्र.१/२००१/१६-अ, दिनांक ११ जून,२००१ च्या परि.२ मधील शेवटच्या वाक्यातील खालील शब्दप्रयोग वगळण्यात यावा :-

**" कटाक्षाने व त्वरित उत्तरे द्यावीत "**

वरील वगळलेल्या शब्दप्रयोगांऐवजी खाली दिलेले शब्दप्रयोग समाविष्ट करण्यात यावेत :-

**" तीं विषयाशी संबंधित विभागात / कार्यालयात प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत अंतरिम उत्तरे व तीन महिन्यांच्या आत अंतिम उत्तरे द्यावीत."**

२. सर्व मंत्रालयीन विभागांनी वरील सुधारणा त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग/कार्यालये यांच्या निदर्शनास आणाव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( द.दा.देशपांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

(१) राज्यपालांचे सचिव,
(२) मुख्यमंत्री यांचे सचिव,
(३) उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
(४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
(५) मुख्य सचिव,
(६) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
(७) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
(८) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ, मुंबई,
(९) निवड नस्ती / सा.प्र.वि./१६-अ.